एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) अंतर्गत राज्य सेवा परीक्षा-२०२२ द्वारे शिफारसप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. सीपीटीपी-०३२५/प्र.क्र.९८/ई-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक:- २७ मार्च, २०२५**

<u>संदर्भ</u>:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१४/प्र.क्र.७/१४/१८-ब, दि.२२.०४.२०१५
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-१११४/प्र.क्र.८३/१४/१८-ब, दि.०३.११.२०१४
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०८१४/प्र.क्र.६४/१४/१८-ब, दि.११.११.२०१४
५) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-११२४/प्र.क्र.७५/प्रशि-२, दि.२१.०२.२०२५
६) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-११२४/प्र.क्र.७५/प्रशि-२, दि.१२.०३.२०२५
७) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०६२३/प्र.क्र.६४/सीपीटीपी, दि.२२.०९.२०२३
८) उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांचे दि.०४.०३.२०२५ व दि.१७.०३.२०२५ रोजीचे कार्यालयीन आदेश.

**<u>शासन आदेश:-</u>**

एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत राज्य सेवा परीक्षा-२०२२ द्वारे शिफारसप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना सीपीटीपी-१० या तुकडीमध्ये प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यानुषंगाने, सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.५ येथील आदेशान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत सीपीटीपी-१० या तुकडीमध्ये उप जिल्हाधिकारी संवर्गातील १६ उमेदवारांना बुधवार, दि.०२.०४.२०२५ पासून दोन वर्षाच्या प्रशिक्षणासाठी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली आहे.

२. संदर्भाधीन क्र.६ येथील परिपत्रकान्वये राज्यसेवा परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे शिफारसप्राप्त ठरलेल्या गट अ व गट ब मधील उमेदवारांच्या प्रशिक्षणासाठीचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० करिता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन परिपत्रकामधील

तरतूदी विचारात घेऊन उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांनी संदर्भाधीन क्र.७ येथील आदेशान्वये उप जिल्हाधिकारी संवर्गातील १६ उमेदवारांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यातील प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करण्याबाबत कळविले आहे.

३. त्यानुषंगाने एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत सीपीटीपी-१० या तुकडीमध्ये उप जिल्हाधिकारी संवर्गातील १६ उमेदवारांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यातील प्रशिक्षणासाठी पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

| अ. क्र. | परिविक्षाधीन उप जिल्हाधिका-यांचे नाव | प्रशिक्षणासाठी जिल्हा | |
|---|---|---|---|
| | | वाटप करण्यात आलेला जिल्हा | विभाग |
| १) | श्री.विनायक नंदकुमार पाटील | वर्धा | नागपूर |
| २) | श्री.गणेश दत्तात्रय दिघे | भंडारा | नागपूर |
| ३) | श्री.शुभम गणपती पाटील | गोंदिया | नागपूर |
| ४) | श्री.कल्पेश विठ्ठल तायडे | बुलढाणा | अमरावती |
| ५) | श्री.आनंद सुदामराव जाधव | चंद्रपूर | नागपूर |
| ६) | श्री.मिलिंद गोविंदराव जगदाळे | अकोला | अमरावती |
| ७) | श्री.सागर धनाजी मुळीक | वाशिम | अमरावती |
| ८) | श्री.बालाजी शिवाजी कदम | चंद्रपूर | नागपूर |
| ९) | श्री.गंगाधर गौतम होवाळे | यवतमाळ | अमरावती |
| १०) | श्रीमती सोनाली अर्जुनराव मात्रे | अहिल्यानगर | नाशिक |
| ११) | श्रीमती सोनल रमेश सुर्यवंशी | अमरावती | अमरावती |
| १२) | श्रीमती करिश्मा प्रताप चौधरी | जालना | छत्रपती संभाजीनगर |
| १३) | श्री.किरण भास्कर वागस्कर | भंडारा | नागपूर |
| १४) | श्री.प्रफुल गोपाळराव चौधरी | वर्धा | नागपूर |
| १५) | श्रीमती पूजा अरुण वंजारी | छत्रपती संभाजीनगर | छत्रपती संभाजीनगर |
| १६) | श्री.प्रशांत बाळासाहेब सानप | बुलढाणा | अमरावती |

(१) उपरोक्त परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना विविध विभागांतर्गत खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षण कार्यक्रमासंदर्भात स्वतंत्र पुस्तिका प्रसिद्ध करण्यात आली आहे. त्यानुसार, संबंधित जिल्हाधिकारी यांनी परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांचा दि.०२.०४.२०२५ पासून प्रशिक्षण कार्यक्रम तात्काळ तयार करावा व त्याची प्रत परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करून द्यावी.

(२) परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांनी दैनंदिन रोजनिशी दररोज न चुकता ई-मेलद्वारे संबंधित जिल्हयातील निवासी उप जिल्हाधिकारी व संपर्क/ समन्वय अधिकारी, अपर आयुक्त (महसूल) यांना सादर करावी.

(३) विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांनी प्रशिक्षणार्थीवर प्रत्यक्ष नियंत्रण ठेवावे. तसेच, प्रशिक्षणार्थीवर प्रत्येक महिन्यात केलेल्या कामकाजाचे मूल्यमापन व अनुभवाच्या आधारावर मासिक अहवाल घ्यावा व सदर अहवालाचे मूल्यमापन करावे. प्रत्येक महिन्यास याचा अहवाल प्रमाणित करून सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावा.

(४) परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांच्या दैनंदिन उपस्थिती/ अनुपस्थिती/ वर्तन इ. बाबत संबंधित जिल्ह्यातील जिल्हाधिकारी यांनी समन्वय अधिकारी, अपर आयुक्त (महसूल) यांना अहवाल सादर करावा.

(५) प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थीने गैरवर्तन केल्याचे अथवा प्रशिक्षण पुरेशा गांभीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास अशा घटना त्वरित संबंधित जिल्हाधिकारी यांनी समन्वय अधिकारी/ विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी तसेच अपर आयुक्त (महसूल) यांच्याशी संपर्क साधून निदर्शनास आणून देण्यात याव्यात. या संबंधित अहवाल समन्वय अधिकारी अपर आयुक्त (महसूल) यांनी शासनाच्या महसूल व वन विभाग व सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

(६) परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या विभागातील विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवर अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत. प्रशिक्षणार्थीना वाटप केलेल्या विभागातील परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांचे वेतन व भत्ते संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत अदा करण्यात येतील.

(७) खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणा-या परीक्षा प्रशिक्षणार्थींनी विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच, प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

(८) विभागीय प्रशिक्षणाच्या टप्प्यांमध्ये परिविक्षाधीन उप जिल्हाधिकाऱ्यांचे मुल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र टीआरएन-१११४/ प्र.क्र.८४/२८-ब, दि.२२.०४.२०१५ मधील निर्देशानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी, अपर आयुक्त (महसूल) यांची राहील.

(९) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-०४१५/प्र.क्र.१२२/ई-२, दि.१५.०९.२०१५ नुसार परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना वाटप केलेल्या विभागातील समन्वय अधिकारी म्हणून अपर आयुक्त (महसूल) विभागीय आयुक्त कार्यालय यांची नेमणूक करण्यात आली आहे. त्यानुसार समन्वय अधिकारी, अपर आयुक्त (महसूल) यांनी प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी योग्य ती दक्षता घ्यावी.

(१०) परिविक्षाधीन उप जिल्हाधिकाऱ्यांना केवळ प्रशिक्षणासाठीच जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

(११) परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांना प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या जिल्ह्यात दि.०२.०४.२०२५ पासून रुजु व्हावे व तसा अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

(१२) सदर जिल्हा संलग्नता ही सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.०२.२०२५ रोजीच्या आदेशामधील परिच्छेद ३ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. तसेच, सदर उमेदवारांना उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांच्या दि.०४.०३.२०२५ व

दि.१७.०३.२०२५ रोजीच्या आदेशासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३२७१५१०४९०३१९ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2025.03.27 16:11:41 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) सर्व विभागीय आयुक्त.
४) सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
५) उप सचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) संबंधित प्रशिक्षणार्थी.

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८) संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
९) संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
१०) उप सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) निवडनस्ती (ई-२).